सन २०१४-१५ या वित्तीय वर्षातील
<u>अर्थसंकल्पीय तरतूदीच्या विनियोगाबाबत</u>

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः एमसीओ २०१४/प्र.क्र. १९३/नवि १४

हुतात्मा राजगुरू चौक, मादम कामा मार्ग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०१४**

**वाचा -**

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांकः अर्थस २०.१४/प्र.क्र. ६६/अर्थसंकल्प-३, दि. २९.०३.२०१४

२) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्रमांकः लेखानु २०१४/प्र.क्र. २७/नवि-४, दि १५.०४.२०१४

३) शासन वित्त विभाग क्रमांकः अर्थस २०.१४/प्र.क्र. ६६/अर्थसंकल्प-३, दि. १७.०४.२०१४

४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक : अंदाज २०१४/प्र.क्र. ११०/अर्थ-३, दि. ०१.०७.२०१४

५) शासन परिपत्रक नगर विकास विभाग : वानियो २०१४/प्र.क्र ९४/नवि-४, दि. २१.०७.२०१४

६) शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. मुमस २०१४/१७९/प्र.क्र. १३४/९४/नवि २४, दि. २५.०८.२०१४

**प्रस्तावना -**

उपरोक्त क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये सन २०१४-१५ या वर्षाकरीता प्रस्तावित केलेल्या विनियोजनांची अनुसूची मधील स्तंभ क्र. ७ व ८ येथे दर्शविलेल्या रक्कमांचे तात्काळ वाटप करण्याच्या सूचना वित्त विभागाने दिल्या होत्या. त्यानुषंगाने उपरोक्त संदर्भ क्र. २ अन्वये या विभागाकडील मागणी क्र. एफ-२, २२१७ नगर विकास, १९२, नगरपरिषदांना सहाय्य (००)

(६०) नगरपरिषदांना सहाय्यक अनुदान (२२१७८०६६) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील रु. ४३३.३३ कोटी एवढे अनुदान वाटप करण्यात आले आहे. उपरोक्त संदर्भ क्र. ४ अन्वये वित्त विभागाकडून प्रशासकीय विभागांना सन २०१४-१५ च्या प्रथम आठमाहीकरीता (नोव्हेंबर २०१४ अखेर) आवश्यक असणारा अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६०% च्या मर्यादेत उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्पित असलेल्या एकूण १३०० कोटींच्या ६०% म्हणजे रु. ७८० कोटीमधून लेखानुदानाची रक्कम रु. ४३३.३३ कोटी वजा जाता उर्वरीत रक्कम रुपये ३४६.६७ कोटी इतकी रक्कम वितरणासाठी उपलब्ध असुन सदर रक्कम नगरपरिषदांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०१४-१५ च्या पहिल्या आठ महिन्यांकरीता वरील लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन दिलेल्या रु. ७८० कोटीपैकी यापूर्वी वितरित केलेला निधी रु. ४३३.३३ कोटी वजा जाता रु. ३४६.६७ कोटी (अक्षरी रुपये तीनशे शेहेचाळीस कोटी सदुसष्ट लक्ष फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास पुढील अटींच्या अधीन राहुन मान्यता देत आहे.

१. अवितरीत अनुदान नगरपरिषदांना वितरीत करण्यापुर्वी अनुदानाचे अतिप्रदान होणार नाही याची दक्षता आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांनी घ्यावी.
२. निधी खर्च झाल्यानंतर त्याची उपयोगिता प्रमाणपत्र पुढील प्रस्तावासोबत सादर करण्यात यावीत.
३. तसेच लातूर, परभणी व चंद्रपुर या महानगरपालिकांना सलग ५ वर्षे १०% वाढीसह महानगरपालिका स्थापन झाल्यापासुन सहायक अनुदान देण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. या संदर्भात नमुद करण्यात येते की, लातूर, परभणी व चंद्रपूर या नवनिर्मित महानगरपालिकांना स्थापनेनंतर सन २०११-१२ या वर्षातील ५ महिन्यांचे व सन २०१२-१३ या वर्षातील ७ महिन्यांचे सहायक अनुदान संबंधित आर्थिक वर्षात अदा/ वितरीत करण्यात आले आहे. शासनाने उपरोक्त संदर्भ क्र. ६ येथील आदेशानुसार घेण्यात आलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने प्रथमत: सन २०१२-१३ या वर्षातील उर्वरीत ५ महिन्यांकरीता

अनुज्ञेय असलेले सहायक अनुदान सन २०१४-१५ च्या मंजूर उपलब्ध अनुदानातून वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सन २०१३-१४ व २०१४-१५ साठी अनुज्ञेय अनुदान उपलब्ध तरतूदीनुसार टप्प्याटप्प्याने उपलब्ध करुन देण्यात येईल.

०२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौस क्र. ५४६/व्यय-३, दि. २९.०९.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००७०९४२११५१२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: CN = Jayasingrao Nanasaheb Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2014.10.08 18:25:20 +05'30'

**(ज. ना. पाटील)**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी
४. महालेखापाल (ले व अ) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई/ नागपूर
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
९. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

११.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

१२.अवर सचिव/ कक्ष अधिकारी, नवि १६/४

१३.निवड नस्ती, नवि १४